केंद्र शासनाच्या "कारागृह सुधारणा" या केंद्र पुरस्कृत (७५:२५) योजनेतर योजनेसाठी राज्यस्तरीय उच्चाधिकार समिती स्थापन करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-एमआयएस-२००२/प्र.क्र.१४७/पीआरएस-२.**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक :- ९ डिसेंबर, २००२.**

**वाचा:- केंद्र शासनाच्या गृह मंत्रालयाचे क्रमांक-१६०१३/५/२००१-जीपीए-रोमन थार, दिनांक २१ नोव्हेंबर,२००१ चे पत्र.**

**शासन निर्णय :-** केंद्र शासनाच्या गृह मंत्रालयाने "कारागृह सुधारणा" ही योजनेतर योजना नव्याने या वर्षापासून सुरु करीत असल्याचे कळविले असून सदर योजनेसाठी सन २००२ ते २००७ या ५ वर्षासाठी सर्व राज्यांसाठी रु.१८०० कोटींची तरतूद करण्यात आलेली असून या योजनेअंतर्गत राज्याने १) नवीन कारागृहाचे बांधकाम २) अस्तित्वात कारागृहांची दुरुस्ती व नूतनीकरण ३) स्वच्छता व पाणीपुरवठा व ४) कारागृह कर्मचाऱ्यांची निवासस्थाने इत्यादी संदर्भात सन २००२-०३ या आर्थिक वर्षासाठी तसेच २००२ ते २००७ या पाच वर्षाच्या कालावधीसाठी अंदाजित रु.१२९.१६ कोटी मंजूर केल्याचे कळविले असून यामध्ये राज्य शासनाचा हिस्सा म्हणून रु.३२.३० कोटी इतका देय आहे.

२. या योजनेच्या मार्गदर्शक सूचना केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या असून त्यामध्ये मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय उच्चाधिकार समिती स्थापन करुन वर नमूद अंदाजित रकमेच्या अधीन राहून उच्चाधिकार समितीच्या मान्यतेने सन २००२-०३ या वार्षिक योजनेसाठी रु.२५.८३ कोटींचा व २००२ ते २००७ या पंचवार्षिक योजनेचा प्रस्ताव मंजुरीसाठी पाठविण्याबाबत कळविलेले आहे. त्या अनुषंगाने केंद्र शासनाकडे या योजनेचा वार्षिक /पंचवार्षिक आराखडा मंजुरीसाठी पाठविण्यासाठी तसेच या योजनेच्या मार्गदर्शक सूचनेनुसार योजनेच्या अंमलबजावणीसाठी पुढीलप्रमाणे राज्यस्तरीय उच्चाधिकार समिती स्थापन करण्यात येत आहे :-

**कारागृह सुधारणा राज्यस्तरीय उच्चाधिकार समिती**

| | |
|---|---|
| **मुख्य सचिव** | **पदसिध्द अध्यक्ष** |
| **अप्पर मुख्य सचिव(गृह)** | **सदस्य** |
| **प्रधान सचिव (तुरुंग)** | **सदस्य** |
| **प्रधान सचिव (नियोजन)** | **सदस्य** |
| **प्रधान सचिव (वित्त)** | **सदस्य** |
| **सचिव (बांधकाम)** | **सदस्य** |
| **कारागृह महानिरीक्षक,पुणे** | **सदस्य सचिव** |

**समितीची कार्यकक्षा :-**

१) केंद्र पुरस्कृत कारागृह सुधारणा योजनेअंतर्गत सन २००२-०३ या वार्षिक योजनेचा तसेच २००२-२००७ या पंचवार्षिक योजनेचा प्रस्ताव केंद्र शासनाकडे पाठविण्यासाठी मंजुरी देणे.

२) या योजनेच्या अंमलबजावणीसाठी लागणाऱ्या राज्य हिस्स्याची (२५ टक्के) रक्कम वेळेवर उपलब्ध करुन देण्याबाबत निधीची तरतूद करणे.

३) या योजनेसाठी निधीचे वितरण,खर्च व योजनेची अंमलबजावणीच्या प्रगतीबाबत केंद्र शासनास माहिती पाठविण्यासाठी आढावा घेणे.

४) या योजनेचा आढावा व अंमलबजावणीच्या अनुषंगाने या समितीची दर ३ महिन्यांनी बैठक होईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( र.ना.माळी )
कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन

प्रति,
मा.राज्यपाल यांचे सचिव.
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव.
मा.उपमुख्यमंत्री यांचे उप सचिव.
मा.राज्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव.
मा.मुख्य सचिव.
प्रधान सचिव/सचिव (गृह/तुरुंग/वित्त/नियोजन/सार्वजनिक बांधकाम)
कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक(मुख्यालय/पुणे/औरंगाबाद/मुंबई/नागपूर).
सर्व कारागृह अधिक्षक.
महालेखापाल,महाराष्ट्र-१/२(लेखा व अनुज्ञेयता) ,मुंबई/नागपूर
महालेखापाल,महाराष्ट्र-१/२(लेखा परिक्षा) ,मुंबई/नागपूर.
अवर सचिव,कार्यासन बीयुडी-१.